मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा यांनी तक्रार युएलपी क्र.१८/२००७ मध्ये दिनांक ५.५.२०१२ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करणेबाबत..

श्री. प्रेमलाल मोहन मेंढे

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र.एस-३०/२०१२/प्र.क्र. ३२३/फ-९**

**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**

**दिनांक :- १ ऑक्टोबर, २०१५**

**वाचा :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-७(२)/आस्था-३/प्र.क्र. ६(१२-१३)/ १५६/१२-१३, दिनांक ६.८.२०१२

**प्रस्तावना** :-

उपवनसंरक्षक, गोंदिया वनविभागांतर्गत गोरेगांव वनपरिक्षेत्रात रोजंदारीने काम करीत असलेले तक्रारदार मजूर श्री. प्रेमलाल मोहन मेंढे यांनी शासन सेवेत नियमित करुन तद्नूषंगिक लाभ मिळण्याबाबत मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा येथे दिनांक २१.०३.२००७ रोजी तक्रार दाखल केली. सदर तक्रार युएलपी क्रमांक १८/२००७ मध्ये दिनांक ०५.०५.२०१२ रोजी शासनाविरुध्द निर्णय दिला. या निर्णयाविरुध्द मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे दाखल केलेली रिट याचिका क्रमांक २२४२/२०१३ मध्ये दिनांक २०.०९.२०१३ रोजी निर्णय देऊन खारिज केली. या निर्णयाविरुध्द मा. सर्वोच्च न्यायालयात स्पेशल लिव्ह पिटीशन दाखल करण्यास मान्यता देण्याच्या प्रस्तावास विधी व न्याय विभागास सहमती दिलेली नाही. त्यामुळे श्री. मेंढे यांना कायम करून कायमपणाचे फायदे देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा यांनी तक्रार युएलपी क्र.१८/२००७ मध्ये दिनांक ५.५.२०१२ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याकरीता, दिनांक १.११.१९९४ पासून १ अधिसंख्य पद निर्माण करून, श्री.प्रेमलाल मोहन मेंढे यांना देय असलेली थकबाकीची रक्कम रु.१२,६२,६०१/- (रूपये बारा लाख बासष्ट हजार सहाशे एक फक्त) अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदरहू तक्रारदाराला अदा करावयाची थकबाकीची रक्कम अचूक असल्याची खातरजमा मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांनी करावी.

सदरहू खर्च मागणी क्रमांक सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१- वनीकरण, १०१- वनसंधारण व विकास, १०१ (१०) (१) वनमजूरांच्या अधिसंख्य पदांची निर्मिती (२४०६ १८९८) या लेखाशिर्षातंर्गत सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २६०/२०१५/व्यय-१०, दिनांक १३.८.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००११६५९२३६७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.10.01 17:04:29 +05'30'

**(वीरेन्द्र तिवारी)**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर.
५. उपवनसंरक्षक गोंदिया वन विभाग, गोंदिया.
६. कार्यासन अधिकारी, व्यय- १०, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
७. कार्यासन अधिकारी, सा.प्र.वि./१२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. महालेखापाल-II (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१०.ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.फ-९ कार्यासन,महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२ ( निवड नस्ती)